अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून नवीन महाविद्यालय कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबत...

**श्री.शामगीर शिक्षण संस्थेचे जय भारत कॉलेज ऑफ एमसीए, दापका, ता.निलंगा, जि.लातूर**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२४/प्र.क्र.१६४/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: ०२ ऑगस्ट, २०२४.**

**वाचा** : १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ.क्र.वेस्टर्न/२०२४-२५/ १-४४०३१३७७९९९, दि.३०.०५.२०२४.
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/एनजीसी/नवीन संस्था मान्यता/एमसीए/ २०२४/४५०, दि.०४.०७.२०२४.

**प्रस्तावना :** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी उपरोक्त क्र.१ येथील दि.३०.०५.२०२४ च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्रशिक्षण यांनी क्र.२ येथील दि.०४.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये, श्री.शामगीर शिक्षण संस्थेचे जय भारत कॉलेज ऑफ एमसीए, दापका, ता.निलंगा, जि.लातूर हे नवीन महाविद्यालय कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून उक्त महाविद्यालयास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून श्री.शामगीर शिक्षण संस्थेचे जय भारत कॉलेज ऑफ एमसीए, दापका, ता.निलंगा, जि.लातूर हे नवीन महाविद्यालय कायम विनाअनुदानित तत्वावर खालील अभ्यासक्रम व प्रवेश क्षमतेसह, प्रचलित अटी व शर्तीच्या अधीन राहून शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | अभ्यासक्रमाचे नाव | प्रवेश क्षमता |
|---|---|---|
| १ | एमसीए (MCA) | ६० |

**अटी व शर्ती:-**

१) सदर मान्यता कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता करणे, महाविद्यालयावर बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत महाविद्यालयाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांच्याशी करारनामा करावा लागेल. तसेच, महाविद्यालयाने आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण यांच्या संमतीने समाधानकारकरित्या पूर्ण करावी.

४) संबंधित महाविद्यालयाने, संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क महाविद्यालयाने आकारल्यास, महाविद्यालयावर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) महाविद्यालयाने अभ्यासक्रम चालविण्याकरिता पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली व संबंधित विद्यापीठाच्या मानकानुसार नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच, शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इ. बाबत तसेच, विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास महाविद्यालयावर कडक कारवाई करण्यात येईल.

८) महाविद्यालयाने ग्रंथालयाकरिता आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक राहील. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंगसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे महाविद्यालयांवर बंधनकारक राहील.

१०) महाविद्यालयाने सदर अभ्यासक्रम चालविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेकरिता शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्याचे निदर्शनास आल्यास त्यांची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी महाविद्यालयाची राहील.

११) जर महाविद्यालयाने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फीचा भरणा केलेला नसेल तर, अंतीम मान्यता देण्यापूर्वी संचालकांनी महाविद्यालयाकडून प्रोसेसिंग फी वसूल करावी.

१२) शासन निर्णय दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित महाविद्यालय / संस्थेने भरणा केले नसेल, तर ते सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांनी संबंधित महाविद्यालय / संस्थेकडून भरणा करुन घ्यावे.

१३) महाविद्यालयाने संबंधित विद्यापीठाचे संलग्निकरण प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती महाविद्यालयावर बंधनकारक राहतील.

३. या शासन मान्यतेनुसार उक्त महाविद्यालयातील अभ्यासक्रमांचा केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये समावेश होण्याकरिता संचालक, तंत्र शिक्षण यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०२११३३२७२८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=d203fe3b025c07c7692f5c23a43a4905f46cdde0ef54f3944caf1c620a5bc64e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BF4EB2A0C007D6CA5A25B0E564499E5FF904468E1A96902315E3E67299424039, cn=SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2024.08.02 11:47:45 +05'30'

**(शहाजहान मुलाणी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) संबंधित महाविद्यालय (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती/तांशि-४